**नागपूर शहरातील मौजा लेंड्रा, ख.क्र. १४२/२, प्लॉ.क्र. ४/ LA येथील जागेसंदर्भात अधिमूल्य निश्चिती करणे तसेच निविदा प्रणाली राबविण्या करीता निविदा समिती गठीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : नासुप्र-१६२५/प्र.क्र.९७/नवि-२६**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २९ मे, २०२५.

**वाचा :- १)** सभापती, नागपूर सुधार प्रन्यास, यांचे पत्र क्र.संपत्ती विभाग/५८६२, दि.१६ मे, २०२५
**२)** नागपूर सुधार प्रन्यास विश्वस्त मंडळ ठराव क्र १०, दि. १४ मे, २०२५

**प्रस्तावना :-**

१. सभापती, नागपूर सुधार प्रन्यास, यांनी संदर्भ क्र. १ येथील पत्रान्वये

अ) जनहित याचिका क्र. ४/२०२४ अन्वये मा. उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर यांनी दि. २८ एप्रिल, २०२५ रोजी दिलेल्या आदेशानुसार वैद्यकीय प्रयोजनाकरीता मौ. लेंड्रा, खसरा क्र. १४२/२ येथील ६२,८८८ चौ. फुट जागेचे येणाऱ्या अधिमुल्यावर नागपूर सुधार प्रन्यास जमीन विनियोग नियम १९८३ च्या नियम २० (६) नुसार सवलत देऊन तसेच राज्य शासनास नियम २६ नुसार प्राप्त अधिकारांन्वये पुढे शिथिलता देऊन त्यावर २५ टक्के अतिरिक्त सवलत देण्याबाबत व

ब) नागपूर सुधार प्रन्यास जमीन विनियोग नियम १९८३ अन्वये तज्ञ समितीने केलेल्या शिफारसीनुसार सदर जागेच्या विनियोगाकरीता निविदा तयार करणे व प्राप्त निविदांचे मुल्यांकन करणे याकरीता शासनाचे प्रतिनिधी अंतर्भूत करून समिती गठीत करण्याबाबत प्रस्ताव शासनाच्या मान्यतेस्तव सादर केले आहेत.

सदर प्रस्तावास शासन मान्यतेस्तव सादर करण्यास संदर्भ क्र. २ येथील नागपूर सुधार प्रन्यास विश्वस्त मंडळ ठरावानुसार मान्यता प्राप्त आहे.

२. मा. उच्च न्यायालयाने दि. २८ एप्रिल, २०२५ रोजी दिलेले आदेश, गठित तज्ञ समितीच्या शिफारासी तसेच नागपूर सुधार प्रन्यास विश्वस्त मंडळाने ठराव दि. १४ मे, २०२५ अन्वये दिलेली मान्यता या पार्श्वभूमीवर नागपूर सुधार प्रन्यासद्वारे सादर उपरोक्त प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

**१.** नागपूर सुधार प्रन्यासद्वारे सादर प्रस्तावाच्या अनुषंगाने

अ) मौ. लेंड्रा, खसरा क्र. १४२/२ येथील ६२,८८८ चौ. फुट जागेच्या येणाऱ्या अधिमुल्यावर नागपूर सुधार प्रन्यास जमीन विनियोग नियम १९८३ च्या नियम २० (६) नुसार सवलत देऊन तसेच राज्य शासनास नियम २६ नुसार प्राप्त अधिकारान्वये पुढे शिथिलता देऊन

त्यावर २५ टक्के अतिरिक्त सवलत देऊन रु.१०,६३,६१,५७५ इतक्या मूळ अधिमूल्यावर वैद्यकीय प्रयोजनाकरीता जागेचा विनियोग करण्याकरीता निविदा प्रक्रीया राबविण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

(ब) मौ. लेंड्रा, खसरा क्र. १४२/२ येथील ६२,८८८ चौ. फुट जागेचे नागपूर सुधार प्रन्यास जमीन विनियोग नियम १९८३ मधील नियमानुसार विनियोग करण्याकरीता निविदा तयार करणे व प्राप्त निविदांचे मुल्यांकन करण्याकरीता निविदा समिती गठीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. समितीची संरचना पुढीलप्रमाणे असेल:

| अ.क्र. | नाव व पदनाम | पद |
|---|---|---|
| १ | सभापती, नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर | अध्यक्ष |
| २ | डॉ. राज गजभीये, अधिष्ठाता, जिल्हा सरकारी वैद्यकीय महाविद्यालय, नागपूर | सदस्य |
| ३ | श्रीमती विद्या हम्पय्या, सह सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ४ | श्री. जनार्दन भानुसे, अधिक्षक अभियंता,सार्वजनिक बांधकाम विभाग, नागपूर | सदस्य |
| ५ | श्री. प्रशांत भांडारकर, अधिक्षक अभियंता, नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर | सदस्य |
| ६ | डॉ. वैभवी दाणी, अध्यक्ष, झोनल ट्रान्सप्लान्ट को-ऑर्डिनेशन सेंटर, नागपूर | सदस्य |
| ७ | डॉ. लोकेंद्र सिंग, संचालक, सेंट्रल इंडिया इन्स्टिट्युट ऑफ मेडिकल सायन्स, नागपूर | सदस्य |
| ८. | डॉ. श्रीकांत मुकेवार, गॅस्ट्रोएंटेरोलॉजिस्ट, नागपूर | सदस्य |
| ९. | डॉ. संजीव चौधरी, अस्थितज्ञ, नागपूर | सदस्य |

२. **समितीची कार्यकक्षा :-**निविदा समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे असेल:

i. जागेसंदर्भात अधिमूल्य निश्चिती करणे,
ii. निविदा तयार करणे,
iii. निविदा तयार करण्यासाठी आवश्यकता असल्यास सल्लागार निवडणे,
iv. निविदा प्रक्रियेचे संनियंत्रण करणे
v. प्राप्त निविदांचे मुल्यापन करणे
vi. योग्य धर्मदाय संस्था/ प्रन्यास यांची निवड करणे.

३. निविदा समितीचा कार्यकाळ शासन निर्णय निर्गमित झाल्यापासून ३ महिने असेल.

४. समितीतील अशासकीय सदस्यांना कोणतेही भत्ते किंवा सुविधा अनुज्ञेय नसतील.

५. सदर समितीच्या संरचनेत आवश्यकतेनुसार बदल करण्याचे अधिकार शासनास असतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०५२९१२५८२२४०२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIDYA RAMAPPA HAMPAYYA

Digitally signed by VIDYA RAMAPPA HAMPAYYA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=7b40f543d9d95d4cad6707bb7eae1089289d9878b7cb34418f111566e3223ba1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A94EF1B631F4673B829AC9ADBEB5B0DDABD086A7544E3FDF47CD7A011FF7EA40, cn=VIDYA RAMAPPA HAMPAYYA
Date: 2025.05.29 12:59:51 +05'30'

**(विद्या हम्पय्या)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रतः-**

१) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा. उपमुख्यमंत्री (नगरविकास) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) प्रधान सचिव, नवि-२, नगरविकास विभाग यांचे विशेष कार्यकारी अधिकारी, मंत्रालय, मुंबई
४) सभापती, नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर,

यांना विनंती करण्यात येते की, निविदा समितीच्या सदस्यांना नियुक्तीसंदर्भात अवगत करावे व समितीची कार्यवाही तातडीने सुरु करावी.

५) डॉ. राज गजभीये, अधिष्ठाता, जिल्हा सरकारी वैद्यकीय महाविद्यालय, नागपूर
६) सह सचिव, नवि-२६, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
७) श्री. जनार्दन भानुसे, अधिक्षक अभियंता,सार्वजनिक बांधकाम विभाग, नागपूर
८) श्री. प्रशांत भांडारकर, अधिक्षक अभियंता, नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर
९) डॉ. वैभवी दाणी, अध्यक्ष, झोनल ट्रान्सप्लान्ट को-ऑर्डिनेशन सेंटर, नागपूर
१०) डॉ. लोकेंद्र सिंग, संचालक, सेंट्रल इंडिया इन्स्टिट्युट ऑफ मेडिकल सायन्स, नागपूर
११) डॉ. श्रीकांत मुकेवार, गॅस्ट्रोएंटेरोलॉजिस्ट, नागपूर
१२) डॉ. संजीव चौधरी, अस्थितज्ञ, नागपूर
१३) श्री. देवेंद्र चौहान शासकीय अभियोक्ता, मा. उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर

यांना विनंती करण्यात येते की, सदर शासन निर्णय मा. उच्च न्यायालयाच्या निदर्शनास आणावा.

१४) निवडनस्ती (नवि-२६)